अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-`अ` या संवर्गातून सहसंचालक, गट-`अ` या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्ती.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक :- पदोनि १११६/प्र.क्र.१९३ /का. १४२७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४ जून, २०१८

**शासन आदेश :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील उपसंचालक, गट-`अ` (वेतनसंरचना, वेतन बॅड रु.१५६०० - ३९१००/- + ग्रेड पे रु.५४००/-) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना सहसंचालक, गट-`अ` (वेतनसंरचना, वेतन बॅड रु.१५६०० - ३९१००/- + ग्रेड पे रु.६६००/-) संवर्गातील पदावर खालील परिच्छेद - २ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून या आदेशाच्या दिनांकापासून दिनांक १३ मे, २०१९ (म.नं.) पर्यंत किंवा नियमित अधिकारी उपलब्ध होईपर्यंत ११ महिन्यांसाठी केवळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. दिनांक १३ मे, २०१९ (म.नं.) रोजी सदरची पदोन्नती आपोआप संपुष्टात येईल. सदरहु तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेल्या पदोन्नतीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | संबंधित अधिकाऱ्यांचे नाव व विद्यमान पदस्थापना | प्रवर्ग | पसंतीचा विभागीय संवर्ग | विभागाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | श्री.दि.हि.वाघ<br>जिल्हा नियोजन अधिकारी,<br>जिल्हा नियोजन समिती,<br>जिल्हाधिकारी कार्यालय,<br>जिल्हा जळगाव | इमाव | नाशिक | नाशिक | सहसंचालक,<br>प्रादेशिक कार्यालय,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>जिल्हा नाशिक |

२. अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील "सहसंचालक" (गट-अ) या संवर्गात संबंधित अधिकाऱ्यांना तात्पुरती पदोन्नती खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

i) "सहसंचालक " (गट-अ) पदावर पदोन्नत संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदस्थापना देण्यात आलेल्या पदाचा पदभार तात्काळ स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे व त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास तसे लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

ii) "सहसंचालक " (गट-अ) पदावर पदोन्नत संबंधित अधिकाऱ्यांनी पदोन्नतीनंतर पदस्थापना देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये बदल करण्याकरिता कोणत्याही स्वरुपात राजकीय दबाव

आणण्याचा प्रयत्न केल्यास ही बाब गंभीर ठरवून त्यांचेविरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाही करण्यात येईल.

iii) "सहसंचालक " (गट-अ) या पदावर पदोन्नत संबंधित अधिकारी पदोन्नती आदेश प्राप्त झाल्यानंतर, देण्यात आलेली पदस्थापना स्वीकारणार नाहीत किंवा विविध सबबीखाली पदस्थापना स्वीकारण्यास टाळाटाळ करतील त्यांना आश्वासित प्रगती योजनेंतर्गत देण्यात आलेले लाभ काढून घेण्यात येतील.

iv) "सहसंचालक " (गट-अ) या पदावर पदोन्नत संबधित अधिकारी पदोन्नतीनंतर पदोन्नतीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांना पदोन्नतीबाबत स्वारस्य नसल्याचे समजून सामान्य प्रशासन विभागाच्या स्थायी आदेशानुसार निवडसूचीतून त्यांचे नांव वगळण्यात येईल. तद्‌नंतर कोणत्याही परिस्थितीत त्यांची विनंती मान्य करता येणार नाही.

v) "सहसंचालक " (गट-अ) या पदावर पदोन्नत संबंधित अधिकारी यांना देण्यात आलेल्या या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी पदोन्नतीच्या पदावरील नियमित पदोन्नतीसाठी पात्र आहेत, असा या पदोन्नतीचा अर्थ होणार नाही व या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे त्यांना नियमित पदोन्नतीचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

vi) "सहसंचालक" (गट-अ) पदावर पदोन्नत संबंधित अधिकारी यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहील.

३. अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील "सहसंचालक " (गट-अ) या संवर्गात पदोन्नत झालेल्या संबंधित अधिकाऱ्याच्या पदाचा पदभार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून त्यांना पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याकरिता संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करावे व ज्या पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे, त्या पदावर त्यांना संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ रुजू करुन घ्यावे. कार्यालय प्रमुखानी संबंधित अधिकाऱ्यांना पदस्थापना देण्यात आलेल्या पदावर रुजू करुन घेण्यास टाळाटाळ केल्यास व सक्तीचा प्रतीक्षाधीन कालावधी नियमित करण्याचा प्रश्न उद्भवल्यास वित्त विभागाच्या शासन निर्णय, क्रमांक-सेनिवे-१००१/१३०/सेवा-४, दि.२.०६.२००३ मधील परिशिष्ट-१, नियम क्र.९ (१४) (एफ) शेरा क्र.२ नुसार सक्तीचा प्रतीक्षा कालावधी निर्माण होण्यास कारणीभूत ठरणाऱ्या अधिकाऱ्यांवर व्यक्तीगत जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

४. सामान्य प्रशासन विभाग (साविस), पत्र क्रमांक - बीसीसी २०१७/प्र.क्र.३१२A/१६ब, दिनांक २९/१२/२०१७ अन्वये - “मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २७९७/२०१७ (स्टॅम्प क्रमांक - ७२५६/२०१५) महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर तसेच इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणात दिनांक ४/८/२०१७ रोजी अंतिम निर्णय दिलेला असून या विरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल करण्यात आलेली विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ प्रलंबित आहे. तथापि, मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या निर्णयास मा.सर्वोच्च न्यायालयाने स्थगिती देण्याबाबत अथवा परिस्थिती “जैसे थे” ठेवण्याबाबत कोणतेही आदेश पारित केलेले नाहीत. या परिस्थितीत पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत.अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीतील मागासवर्गीय अधिकारी / कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी, ते दिनांक २५/५/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून

सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आलेले नाहीत, याची खात्री सर्व प्रशासकीय विभागानी करावी," असे निर्देश देण्यात आले आहेत. त्यामुळे सदर अधिकाऱ्यांना या आदेशाद्वारे पदोन्नतीनंतर देण्यात आलेली नियुक्ती मा.सर्वोच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या विशेष अनुमती याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१४११०१५९१४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Priyanka Ranjan Chhapwale

Digitally signed by Priyanka Ranjan Chhapwale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2295c5c50b6a2aa03b2654fd2f5f69a709a20ae44359c483f3e1b0d4450728d0, cn=Priyanka Ranjan Chhapwale
Date: 2018.06.14 12:15:01 +05'30'

**( प्रियांका रं. छापवाले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (मार्फत - अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई /नागपूर,
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ व २, मुंबई /नागपूर,
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.मंत्री (नियोजन) / मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),
६. जिल्हाधिकारी (सर्व),
७. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८. सर्व सह सचिव/उप सचिव/विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, सर्व
१०.उपायुक्त (नियोजन),विभागीय आयुक्त कार्यालय, सर्व
११.उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१४.अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/का.१६ ब), मंत्रालय, मुंबई.
१५.जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, (सर्व),
१६.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नाशिक / जळगाव
१७.अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१८. कार्यासन अधिकारी (कार्यासन १४२१/१४२२/१४२३/१४१७/१४१८/१४२६), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.निवड नस्ती.